आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सैनिकी शाळांमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य या योजनेंतर्गत निधी वितरण.
(लेखाशीर्ष २२०२ एच ९७३)

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२११/प्र.क्र.०४/कार्यासन ६
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक : -१६ सप्टेंबर,२०२१.

वाचा :-

१) वि. वि. शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१ /प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४.०६.२०२१.
२) आ.वि.वि. शासन पत्र क्र.अआशा-२०२१/प्र.क्र.२०/का-११, दि.३१.०३.२०२१.
३) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय यांचे पत्र क्र.सैनिशा-२०१९/ प्र.क्र.०४/ का.६(३) /२७६४, दि.०९.०६.२०२१.
४) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र.अआशा-२०२१/प्र.क्र.९१/का-११.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत “सैनिकी शाळांमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य” या योजनेंतर्गत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली सन २०२१-२२ च्या आर्थिक तरतुदींतून सन २०२०-२१ करीता विद्यार्थ्यांचे प्रलंबित शैक्षणिक शुल्क व निर्वाह भत्ता अदा करण्याकरीता संदर्भाधीन क्र.४ अन्वये सादर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२०२-सर्वसाधारण शिक्षण या मुख्य लेखाशिर्षांतर्गत “सैनिकी शाळांमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य” या योजनेंतर्गत सन २०२०-२१ करीता विद्यार्थ्यांचे प्रलंबित शैक्षणिक शुल्क व निर्वाह भत्ता अदा करण्याकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदींमधून वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार खालीलप्रमाणे रु.८७.५८५०० लाख इतका निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| **योजनेचे नाव** | **लेखाशिर्ष** | **बाब** | **सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पित तरतूद** | **सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| सैनिकी शाळांमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य | २२०२ एच ९७३ | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | १५००.०० | ८७.५८५०० |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.८७.५८५००लाख (अक्षरी रुपये सत्त्याऐंशी लाख अठ्ठावन्न हजार पाचशे फक्त)** इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर निधी संदर्भाधीन क्र.२ येथील पत्रान्वये दिलेल्या सूचना विचारात घेऊन सन २०२०-२१ मधील प्रलंबित दायित्व अदा करण्यासाठी खर्च करण्यात यावा. प्रकरणी नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.६२०/व्यय-१४, दि.२४.०६.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९०८१७११५०९२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2021.09.17 14:07:06 +05'30'

(रविंद्र दि. औटे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
४. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग
५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
८. सर्व प्रकल्प अधिकारी,एकात्मीक आदिवासी विकास प्रकल्प
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११.निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.